राज्यातील डोंगराळ भागात राबविण्यात येत असलेला साकव बांधणीचा खास कार्यक्रम - साकवांच्या खर्चाच्या मर्यादेत वाढ करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - साकव-२०१३/प्र.क्र.९४/नियोजन-१**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक - ३ सप्टेंबर, २०१५

**वाचा :-**

१) सा.बां.विभागाचा इंग्रजी, शासन निर्णय क्रमांक - पीएलएन-१०८१/ (४५६५)/डेस्क-३०, दिनांक १९.९.१९८१.

२) सा.बां.विभाग, शासन परिपत्रक क्रमांक - योजना -१०९०/प्र.क्र.५६१/ नियोजन-१, दिनांक ४.१०.१९९०.

३) सा.बां.विभाग, शासन परिपत्रक क्रमांक - योजना - १०९२/प्र.क्र.५६०/ नियोजन-१, दिनांक १५.१.१९९६.

४) सा.बां.विभाग, शासन परिपत्रक क्रमांक - योजना - १००६/प्र.क्र.२७४/ नियोजन-१, दिनांक ३०.१०.२००७.

**प्रस्तावना**

राज्यातील डोंगराळ भागात साकव बांधणी कार्यक्रम अंतर्गत बांधण्यात येत असलेल्या साकव बांधणीच्या खर्चाची आर्थिक मर्यादा वाढविण्याबाबतचे प्रस्ताव मुख्य अभियंता यांचेकडून शासनास प्राप्त झाले आहेत. त्यानुषंगाने साकव बांधणीच्या खर्चाची आर्थिक मर्यादा वाढविण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

उपरोक्त संदर्भ.क्र.१ येथील दिनांक १९.९.१९८१ च्या शासन निर्णय आणि संदर्भ क्र.२ येथील दिनांक ४.१०.१९९० च्या शासन परिपत्रकान्वये राज्यातील डोंगराळ भागात हाती घ्यावयाच्या साकव बांधणीच्या खास कार्यक्रम संदर्भात सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार साकव बांधण्याची आर्थिक मर्यादा रुपये ५ लक्ष इतकी निश्चित करण्यात आली होती. तसेच संदर्भ क्र.३ येथील शासन परिपत्रक, दिनांक १५.१.१९९६ अन्वये साकव बांधणीच्या खर्चाची आर्थिक मर्यादा रुपये ५ लक्ष वरुन रुपये १० लक्ष आणि संदर्भ क्रमांक ४ येथील शासन परिपत्रक, दिनांक ३०.१०.२००७ अन्वये रुपये १० लक्ष वरुन रुपये २० लक्ष इतकी वाढविण्यात आलेली होती. सदर आर्थिक मर्यादा सन २००७-०८ या कालावधीत निश्चित करण्यात आल्यानंतर साकव बांधकामाच्या किंमतीत झालेली वाढ लक्षात घेऊन साकव बांधणीच्या खर्चाची कमाल आर्थिक मर्यादा रुपये ३५.०० लक्ष इतकी निश्चित करण्यात येत आहे.

२. साकव बांधणी कार्यक्रमाखाली हाती घ्यावयाच्या साकवांच्या किंमतीची महत्तम आर्थिक मर्यादा रुपये ३५.०० लक्ष करण्यात येत असून साकव बांधकामांच्या अन्य निकषांबाबत यापूर्वी दिलेले आदेश / सूचना कायम राहतील.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौप.सं.क्र.३९७८/अ.मु.स.नि.वि., दि.२९.४.२०१४ आणि वित्त विभागाच्या अनौप.सं.क्र.१७५/व्यय-११/दि.२३.७.२०१५ यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०३१४३७२५५८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Ganpat Amolkar

Digitally signed by Vijay Ganpat Amolkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Ganpat Amolkar
Date: 2015.09.08 15:19:42 +05'30'

**( विजय अमोलकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सर्व मुख्य अभियंते/ सर्व अधिक्षक अभियंते/ सर्व कार्यकारी अभियंते

२) सर्व जिल्हा नियोजन व विकास मंडळे / सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

३) सर्व मंत्रालयीन विभाग

४) लेखापरिक्षा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

५) वेबसाईटवर प्रकाशनासाठी का.अ., संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) निवडनस्ती / नियोजन-१